**महाराष्ट्र प्रतिसादक्षम विकास कार्यक्रम (MRDP) अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील ८ ठिकाणी भूस्खलन धोक्याचे मूल्यांकन आणि भूस्खलन सौम्यीकरण उपाययोजना याबाबतचा सविस्तर प्रकल्प आराखडा (DPR) तयार करण्याकरीता तांत्रिक सल्लागार संस्थेची नेमणूक करणे या कामाकरीता प्रशासकीय मान्यता देणे बाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र.३०/आव्यप्र-१**
**मादाम कामा मार्ग, मंत्रालय मुंबई, ४०००३२**
**दिनांक :-१७ एप्रिल, २०२५**

**संदर्भ :** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र.३०/आव्यप्र-१, दि.१३.०३.२०२४.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र.३०/आव्यप्र-२, दि.३०.०७.२०२४.
३) दि.०६.०३.२०२५ रोजीच्या राज्य सुकाणू समितीच्या (SSC) बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र.१) च्या शासन निर्णयान्वये कोल्हापूर व सांगली जिल्ह्यातील कृष्णा आणि भीमा नदी खो-यातील भविष्यातील आपत्ती निवारण, क्षमता बांधणी, पूर नियंत्रण व्यवस्थापन, दुष्काळ व पूर व्यवस्थापन इत्यादी नियोजनासाठी जागतिक बँकेच्या सहाय्याने महाराष्ट्र प्रतिसादक्षम विकास कार्यक्रम (MRDP) राबविण्यात येत आहे तसेच संदर्भाधीन क्र.२) च्या शासन निर्णयान्वये प्रकल्पाची अंमलबजावणी व धोरणात्मक दिशा ठरविण्यासाठी कार्यपद्धती निश्चित करण्यात आलेली आहे. सदर कार्यपद्धतीअन्वये दि.१० ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या राज्य सुकाणू समितीच्या बैठकीत कोल्हापूर जिल्ह्यातील ८ ठिकाणी भूस्खलन धोक्याचे मूल्यांकन आणि भूस्खलन संरचनात्मक सौम्यीकरण उपाययोजनांसाठी सविस्तर प्रकल्प आराखडा (DPR) तयार करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे तसेच दि.६ मार्च, २०२५ रोजीच्या बैठकीत तांत्रिक सल्लागार सेवा नियुक्त करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र प्रतिसादक्षम विकास कार्यक्रमातंर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील ८ ठिकाणी भूस्खलन धोक्याचे मूल्यांकन आणि भूस्खलन संरचनात्मक सौम्यीकरण ( Landslide Structural Mitigation ) उपाययोजना याबाबतचा सविस्तर प्रकल्प आराखडा ( Detailed Project Report ) तयार करण्याच्या कामाकरीता तांत्रिक सल्लागार संस्थेची नेमणूक करणे या कामासाठी रुपये १२.०० कोटी ( रुपये बारा कोटी फक्त ) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. कामाचा तपशील खालील तक्त्यात नमूद करण्यात आलेला आहे. :-

| अ. क्र. | तपशील | रक्कम (रु. कोटी) |
|---|---|---|
| १ | Consultancy services for the preparation of Landslide Hazard Assessment & Detailed Project Report for Landslide Mitigation Measures across ८ identified sites in Kolhapur District, Maharashtra | १२.०० |

२. सविस्तर प्रकल्प आराखड्यामध्ये Laboratory Testing, Data Cost, Instrument survey, Proof check, Key personnel and Non key personnel cost इत्यादी बाबींचा समावेश असेल तसेच कोल्हापूर जिल्ह्यातील १) शिपेकर वाडी, २) सातेरी हिल्स, ३) जोतिबा, ४) पन्हाळगड, ५) नागेवाडी, ६) कुपेलवाडी, ७) आप्ती आणि ८) मराठवाडी या ८ स्थळांचा समावेश आहे.

३. सदर प्रस्तावास दि.६ मार्च, २०२५ रोजी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या राज्य सुकाणू समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार मान्यता देण्यात येत आहे.

४. या बाबींवर होणारा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.सी - ०६, २७११, पूर नियंत्रण व जलनिस्सारण, ०१, पूर नियंत्रण, १०३, बांधकामे. (०१) (०१), कोल्हापूर व सांगली जिल्हयातील कृष्णा व भिमा खो-यातील पूर नियंत्रणासाठी महाराष्ट प्रतिसादक्षम विकास कार्यक्रम राबविणे (३० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२७११०९८५) तसेच मागणी क्र.सी - ०६, २७११, पूर नियंत्रण व जलनिस्सारण, ०१, पूर नियंत्रण, १०३, बांधकामे (०१) (०२), कोल्हापूर व सांगली जिल्हयातील कृष्णा व भिमा खो-यातील पूर नियंत्रणासाठी महाराष्ट प्रतिसादक्षम विकास कार्यक्रम राबविणे (७० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२७११०९९४) या द्वारेत्या त्या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०४१७१११२२१९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJEEV ANANT RANE

Digitally signed by SANJEEV ANANT RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=65127096b801093ad7fb61eb80e8615c3832b44354b8038dd89289e85848d9a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8AC7DCEA96B950440D554DF2C7F54D6021A8C9AC921A09CC853B5817534BD427, cn=SANJEEV ANANT RANE
Date: 2025.04.17 11:13:12 +05'30'

**( संजीव राणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, मित्रा, निर्मल भवन, मुंबई.
४) संचालक, आपत्ती व्यवस्थापन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

५) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, कोल्हापूर
६) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा-१), महाराष्ट्र, मुंबई.
७) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
९) सह सचिव तथा वित्तीय सल्लागार, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१२) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका/इचलकंरजी महानगरपालिका
१३) लेखाधिकारी, आ.व्य.प्र. (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (आव्यप्र -२/आव्यप्र-१)